**नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेकडून करण्यात येणा-या विकास कामांच्या दर्जाची त्रयस्थ यंत्रणेकडून तांत्रिक लेखापरिक्षणाची सुधारीत व्यवस्था अमंलात आणण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३३५/नवि-३३**

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

**दिनांक :- २८ ऑगस्ट, २०२०**

संदर्भ :-

१) शासन निर्णय नगर विकास विभाग क्रमांक- संकीर्ण २००८/१३३८/प्र.क्र.१७१/०८/नवि-२०, दिनांक ०२ मार्च, २००८.

२) शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३३५/नवि-३३, दिनांक २८मार्च, २०१८.

३) शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३३५/नवि-३३, दिनांक १८जून, २०१९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील विविध नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमार्फत नागरी सुविधा पुरविण्यात येतात.त्यासाठी पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून विविध विकासकामे करण्यात येतात.त्यामधून करण्यात येणा-या कामांचा दर्जा अपेक्षित मानकाप्रमाणे नसल्याच्या तक्रारी येत असल्याने अश्या विकास कामांच्या दर्जाची त्रयस्थ यंत्रणेकडून तांत्रिक लेखापरिक्षण करण्याबाबतचा निर्णय उपरोक्त संदर्भाधिन शासन निर्णयांन्वये घेण्यात आला आहे. उपरोक्त लेखापरिक्षण अधिक प्रभावी व परिणामकारकपणे करण्यासाठी राज्यातील नामांकित अभियांत्रिकी संस्था/शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये यांची संदर्भाधिन शासन निर्णय क्र.२ मधील "प्रपत्र-अ" व्दारे निवड करण्यात आली आहे. सदर प्रपत्रात राज्यातील अजून काही शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालयांचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून करण्यात येणा-या विकास कामे गुणवत्तापूर्ण पध्दतीने व्हावीत व त्यामधून टिकाऊ मत्ता निर्माण व्हाव्यात यासाठी या कामांच्या दर्जाचे त्रयस्थ यंत्रणेकडून अधिक प्रभावी व परिणामकारक तांत्रिक लेखापरिक्षण करण्यासाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने संदर्भाधीन शासननिर्णय क्र. २ मधील "प्रपत्र-अ" मधील नामसूचीमधील संस्थेंची नावे खालीलप्रमाणे अद्ययावत करण्यात येत आहेत.

**" प्रपत्र-अ "**

(शासन निर्णय नगर विकास विभाग क्रमाक: संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३३५/नवि-३३ दि.१२.०३.२०१८ सोबतचे)

| अ. क्र. | नामांकित अभियांत्रिकी संस्था / शासकीय अभियांत्रिकी महाविद्यालये |
|---|---|
| १ | College of Engg Pune (COEP) |
| २ | Government College of Engg Karad |
| ३ | Government College of Engg Aurangabad |
| ४ | Government College of Engg Jalgaon |

| | |
|---|---|
| ५ | Government College of Engg Amaravati |
| ६ | Shri Guru Gobind Singh Institute of Engineering and Technology Nanded |
| ७ | Sardar Patel College of Engg Andheri |
| ८ | Dr. Babasaheb Ambedkar Lonere |
| ९ | Walchand College of Engg Sangli |
| १० | Government College of Engg Nagpur |
| ११ | Government College of Engg Chandrapur |

**०२.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२८१५०२४७११२५ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

PANDURANG JOTIBA JADHAV

Digitally signed by PANDURANG JOTIBA JADHAV
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=PANDURANG JOTIBA JADHAV
Date: 2020.09.04 13:29:12 +05'30'

**(पां.जो.जाधव)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत :-

१. मा.मंत्री (नगर विकास विभाग) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (नगर विकास विभाग) यांचे खाजगी सचिव
३. मा.मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई.
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव,नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
७. कार्यकारी संचालक,महाराष्ट्र नागरि विकास अभियान संचलनालय.मुंबई.
८. सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
९. महालेखापाल कार्यालय, महाराष्ट्र १/२ मुंबई/नागपूर.
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई उपनगर.
१२. सर्व विभागीय आयुक्त
१३. सर्व जिल्हाधिकारी
१४. अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान, मुंबई.
१५. आयुक्त, सर्व महानगरपालिका.
१६. मुख्याधिकारी,सर्व नगरपरिषदा.
१७. मुख्याधिकारी,सर्व नगरपंचायती.
१८. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१९. निवडनस्ती, (नवि-३३)